शैक्षणिक वर्ष २०२०-२१
नवीन महाविद्यालयांना अंतिम
मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन आदेश क्रमांक एनजीसी २०२०/(१०१/२०)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२.
दिनांक: ३१ जुलै, २०२०.

संदर्भ: १) शासन निर्णय क्र. एनजीसी-२०१७/ (२९/१७)/ मशि-४, दि. १५.०९.२०१७
२) शासन निर्णय क्र. मान्यता-२०१९/ (०१/१९)/मशि-४, दि.३१.०१.२०१९
३) शासन निर्णय क्र. मान्यता-२०२०/ (०१/२०)/ मशि-४, दि. ३१.०१.२०२०
४) सन २०२० चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. ०९ दिनांक २५.०६.२०२०.

शासन आदेश

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ आणि संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या कार्यपद्धतीनुसार राज्यातील अकृषि विद्यापीठांनी शैक्षणिक वर्ष २०१९-२० साठी नवीन महाविद्यालयांना मान्यता देण्यासंदर्भात संदर्भ क्र. २ येथील दि.३१.०१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये इरादापत्र देण्यात आले असून सदर इरादापत्र दि.३१.०१.२०२० पर्यंत वैध आहेत. तसेच संदर्भ क्र.३ येथील दि.३१.०१.२०२० च्या शासन निर्णयान्वये शैक्षणिक वर्ष २०२०-२१ साठी नवीन महाविद्यालयांना मान्यता देण्यासंदर्भात इरादापत्र देण्यात आले आहे. आता, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (च) अन्वये विहीत केल्यानुसार तसेच संदर्भ क्र. ४ येथील दि.२५.०६.२०२० च्या अध्यादेशानुसार राज्यातील अकृषी विद्यापीठांनी अनुपालन अहवाल सकारात्मक शिफारशीसह शासनास सादर केले आहेत. सदर अनुपालन अहवालासोबतचे प्रस्ताव संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयामधील परिशिष्ट “क” अन्वये विहित निकषांप्रमाणे तपासले असता जे प्रस्ताव निकषांची पुर्तता करीत आहेत अशा प्रस्तावांना, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (छ) व त्याखालील परंतुकान्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार पुढील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे नवीन महाविद्यालय शैक्षणिक वर्ष २०२०-२१ पासून सुरु करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून **कायम विनाअनुदान तत्वावर** मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालय | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | मुंबई विद्यापीठ, मुंबई | |
| १ | सेंट अर्नोल्ड एज्युकेशन, सेंट अर्नोल्ड रात्र डिग्री कॉलेज ऑफ कला आणि वाणिज्य, ज्ञानाश्रम कॅम्पस, महाकाली केव्स रोड, अंधेरी (पू.), मुंबई-४०० ०९३. | १) बी.कॉम (०-१२०)<br>२) बी.एस्सी (०-१२०) |

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालय | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| २ | रावसाहेब बाळाराम ज्ञानदेव ठाकूर विद्यामंदिरचे डॉ.अरविंद एम. प्रधान वाणिज्य व कला महाविद्यालय, शारदा निलायम, निलम नगर, मुलुंड (पू), मुंबई-४०० ०८१. | १) बी.ए.(०-१२०)<br>२) बी.कॉम(०-१२०) |
| ३ | तुलसी शिक्षण प्रसारक मंडळाचे आदर्श नाईट कॉलेज ऑफ आर्टस, कॉमर्स अँड सायन्स, कस्तुरी विद्यालय कॅम्पस, दत्त मंदिर रोड, भांडुप(प.), मुंबई-७८. | १) बी.ए.(०-१२०)<br>२) बी.कॉम(०-१२०) |
| ४ | अभय शिक्षण केंद्राचे अभय कॉलेज ऑफ आर्टस, कॉमर्स अँड सायन्स, डॉ.बाबासाहेब आंबेडकर भवन, कन्नमवार नगर-१, विक्रोळी(पू), मुंबई-४०० ०८३. | १) बी.ए.(०-१२०)<br>२) बी.कॉम(०-१२०)<br>३) बी.एस्सी.(०-१२०) |
| ५ | मातोश्री कानबाई, लालबाई आणि मोतीबाई लोहाना कन्या शाळा आणि बालिका गृह चॅरिटेबल ट्रस्टचे आधिया कॉलेज ऑफ लॉ, एन.एस.रोड नं-६, जे.व्ही.पी.डी.स्कीम, जमुनाबाई शाळेजवळ, गेट नं.-४, विलेपार्ले (प.), मुंबई-४०० ०५६. | १) विधी (३ वर्षे)<br>२) विधी (५ वर्षे) |
| ६ | प्रिती अकॅडमी एज्युकेशन सोसायटीचे प्रिती अकॅडमी लॉ कॉलेज, कल्याण-मुरबाड रोड, म्हारळ, ता.कल्याण, जि.ठाणे | १) विधी ३ वर्षे (०-६०) |
| ७ | आयडियल फाऊंडेशन आयडियल कॉलेज ऑफ आर्टस, कॉमर्स अँड सायन्स, मु.पो.पोशेरी, ता. वाडा, जि.पालघर-४२१ ३०३. | १) बी.ए.(०-१२०)<br>२) बी.कॉम.(०-१२०)<br>३) बी.एस्सी.(०-१२०) |
| ८ | फजंदार एज्युकेशन ट्रस्टचे फजंदार वुमेन्स डिग्री महाविद्यालय, वहूर,ता.महाड, जि.रायगड -४०२ ३०१. | १) बी.ए.(०-१२०)<br>२) बी.कॉम.(०-१२०)<br>३) बी.एस्सी (०-१२०) |
| ९ | मुस्लिम एज्युकेशन सोसायटीचे एम.ई.एस.महिला कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, आझाद मैदानाजवळ, जोगळेवाडी, ता.दापोली, जि.रत्नागिरी-४१५ ७१२. | १) बी.ए.(०-१२०)<br>२) बी.कॉम.(०-१२०)<br>३) बी.एस्सी.(०-१२०) |
| १० | जी. आर. पाटील महाविद्यालय कला, वाणिज्य व विज्ञान, वाधिवली, ता. मुरबाड, जि. ठाणे- ४२१ ४०१ | १) बी. कॉम. (०-१२०)<br>२) बी. एस्सी. (०-१२०) |
| ११ | श्रीमती के. एल. तिवारी डिग्री कॉलेज ऑफ कॉमर्स ॲन्ड सायन्स, सर्व्हे नं १८०, १८५, मदर मेरी हायस्कुलजवळ, श्रीप्रस्थ, नालासोपारा (प), ता. वसई, जि. पालघर- ४०१ २०३ | १) बी. कॉम. (०-१२०) |

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालय | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती** | |
| १२ | बुलडाणा अर्बन चॅरिटेबल सोसायटीचे श्रीमंत बसंतीबाई देवकिसनजी चांडक सहकार कला व वाणिज्य महाविद्यालय, डोंगरखंडाळा, ता.जि.बुलडाणा **(याचिका.क्र.४८९७/२०१९ मध्ये मा. न्यायालयाने सदर प्रकरण विचारात घेण्याबाबत आदेश केलेले आहेत.)** | कला (मानवविज्ञान विद्याशाखा), वाणिज्य (वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा), |
| १३ | उत्कर्ष फाऊंडेशनचे उत्कर्ष कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, सिंदखेड राजा, ता.सिंदखेड राजा, जि.बुलडाणा | कला (मानवविज्ञान विद्याशाखा), वाणिज्य (वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा), विज्ञान(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) |
| १४ | जिजामाता शिक्षण संस्था, जालना संचलित रामकृष्ण वायाल पाटील महाविद्यालय, किनगावराजा, ता. सिंदखेडराजा, जि. बुलढाणा | कला, वाणिज्य व विज्ञान |
| १५ | स्व. किशोरबापू देशमुख बहुउद्देशिय संस्थेचे गुरुकुल महाविद्यालय, देऊळगांव,साकरशा, ता.मेहकर, जि.बुलडाणा | कला (मानवविज्ञान विद्याशाखा), वाणिज्य (वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा), विज्ञान (विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) |
| १६ | तुळजादेवी जनकल्याण बहुउद्देशिय संस्था, शानबाई नाईक महिला महाविद्यालय, ढाणकी, ता.उमरखेड, जि.यवतमाळ | कला (मानवविज्ञान विद्याशाखा), वाणिज्य (वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा), विज्ञान (विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) **(महिला महाविद्यालय)** |
| १७ | माऊली ज्ञानेश्वर ग्रामविकास बहुउद्देशिय प्रतिष्ठानचे, स्व.भारतसिंह ठाकूर कला,वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, जवळा, ता.आर्णी, जि.यवतमाळ | कला (मानवविज्ञान विद्याशाखा), वाणिज्य(वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा), विज्ञान (विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) |
| १८ | श्रीधर पाचघरे गुरुजी ज्ञानप्रबोधिनीचे, डॉ.एस.एस.गोरडे विज्ञान महाविद्यालय, पथ्रोट, ता.अचलपूर, जि.अमरावती | विज्ञान (विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा) |

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालय | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर** | |
| १९ | स्व.विष्णुपंत झोडगे बहुउद्देशिय विकास संस्था, श्री.राधे महाविद्यालय, आनंदनगर, प्रतापनगर बाजारा रोड, नागपूर-४४००३६ | १) **वाणिज्य् व व्यवस्थापन-बी.कॉम-** as per syllabus-१२० विद्यार्थी-(माध्यम-मराठी)<br>२) **विज्ञान व तंत्रज्ञान-बी.एस्सी.**(रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र,प्राणीशास्त्र,वनस्पती शास्त्र,गणित,इंग्रजी, मराठी)-१२०विद्यार्थी-(माध्यम-इंग्रजी)<br>३) **मानवीय शास्त्र-बी.ए.**-(मराठी,इंग्रजी,समाजशास्त्र,राज्य शास्त्र,अर्थशास्त्र,इतिहास)-१२०विद्यार्थी-(माध्यम-मराठी) |
| २० | भुपेंद्र मागासवर्गीय बहुउद्देशिय शिक्षण संस्था, ज्ञानदा महिला महाविद्यालय,सर्वे.नं.-९९, वाडेगांव,ता.तिरोडा,जि.गोंदिया-४४१९११ | १) **बी.एस्सी.**-१२० विद्यार्थी (माध्यम-इंग्रजी)-२ अनिवार्य भाषा व ५ ऐच्छिक विषयासह<br>२) **बी.ए.**-२ अनिवार्य भाषा व ४ ऐच्छिक विषयांसह-१२० विद्यार्थी-(माध्यम-मराठी) |
| २१ | श्री. गजानन महाराज शिक्षण एवं कला संस्था, श्री. सखारामजी देशमुख महिला महाविद्यालय, मु.झिलमिली, सर्वे नं-९७,७,१०८८/२, झिलमिली, कामठा रोड मागे, ता.जि.गोंदिया-४४१६०१ | १) **मानवीय शास्त्र-बी.ए.**-(हिंदी, इंग्रजी , अर्थशास्त्र, गृहअर्थशास्त्र, इतिहास,भूगोल)-१२०विद्यार्थी-(माध्यम-हिंदी)<br>२) **विज्ञान व तंत्रज्ञान-बी.एस्सी.** (रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र,प्राणीशास्त्र,वनस्पतीशास्त्र,गणित,इंग्रजी, हिंदी)-१२०विद्यार्थी-(माध्यम-इंग्रजी)<br>३) **वाणिज्य व व्यवस्थापन-बी.कॉम** (वाणिज्य),(हिंदी)अभ्यासक्रमाप्रमाणे -१२० विद्यार्थी-(माध्यम-हिंदी) |

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालय | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद** | |
| २२ | श्री.विश्वेश्वर विद्या विकास संस्था, रामकृष्ण वरिष्ठ महाविद्यालय, दहेगांव, ता.वैजापूर,जि.औरंगाबाद | **अभ्यासक्रम**-बी.ए., बी.कॉम व बी.एस्सी. पदवी अभ्यासक्रम<br>**विद्याशाखा**-मानवविज्ञान, वाणिज्य् व व्यवस्थापन शास्त्र आणि विज्ञान तंत्रज्ञान |
| २३ | शिवबा प्रतिष्ठानचे बाळासाहेब ठाकरे महाविद्यालय, गणेशनगर, गोलापांगरी,ता.जि.जालना | **अभ्यासक्रम**-बी.ए., बी.कॉम व बी.एस्सी. पदवी अभ्यासक्रम<br>**विद्याशाखा**-मानवविज्ञान, वाणिज्य् व व्यवस्थापन शास्त्र आणि विज्ञान तंत्रज्ञान |
| २४ | छत्रपती श्री शिवाजी महाराज स्मारक समिती कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, विझोरा, ता.भोकरदन,जि.जालना | **अभ्यासक्रम**-बी.ए., बी.कॉम व बी.एस्सी. पदवी अभ्यासक्रम<br>**विद्याशाखा**-मानवविज्ञान, वाणिज्य् व व्यवस्थापन शास्त्र आणि विज्ञान तंत्रज्ञान |
| २५ | राजकुंवर बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, राजकुंवर महाविद्यालय, हिवरा राळा, ता.बदनापूर,जि.जालना | **अभ्यासक्रम**-बी.ए., बी.कॉम व बी.एस्सी. पदवी अभ्यासक्रम<br>**विद्याशाखा**-मानवविज्ञान, वाणिज्य् व व्यवस्थापन शास्त्र आणि विज्ञान तंत्रज्ञान |
| २६ | किशोरकुमार जनकल्याण शिक्षण प्रसारक मंडळ, शिक्षण महर्षी वैजनाथराव अकात महाविद्यालय, सातोना, ता.परतूर,जि.जालना | **अभ्यासक्रम**-बी.ए., बी.कॉम व बी.एस्सी. पदवी अभ्यासक्रम<br>**विद्याशाखा**-मानवविज्ञान, वाणिज्य् व व्यवस्थापन शास्त्र आणि विज्ञान तंत्रज्ञान |
| २७ | स्व.हरिवंशराय बच्चन बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, स्वामी विवेकानंद कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, औराळा, ता.कन्नड जि. औरंगाबाद | **अभ्यासक्रम**-बी.ए., बी.कॉम व बी.एस्सी. पदवी अभ्यासक्रम<br>**विद्याशाखा**-मानवविज्ञान, वाणिज्य् व व्यवस्थापन शास्त्र आणि विज्ञान तंत्रज्ञान |
| | **शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर** | |
| २८ | कुलभूषण डॉ.तानाजीराव चोरगे शिक्षण व संशोधन संस्था, डॉ.तानाजीराव चोरगे कला, वाणिज्य व विज्ञान वरिष्ठ महाविद्यालय, नांदगाव जैताळ फाटा, ता.करवीर, जि.कोल्हापूर | बी.ए.<br>बी.कॉम.<br>बी.एस्सी. |

| अ.क्र. | संस्था/महाविद्यालय | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| | **एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई** | |
| २९ | राजकुंवर बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, राजकुंवर महाविद्यालय, किनवट, ता.किनवट जि.नांदेड | **विद्याशाखा**- कला,वाणिज्य आणि विज्ञान |
| ३० | राजकुंवर बहुउद्देशिय सेवाभावी संस्था, राजकुंवर महाविद्यालय, ता.वणी, जि.यवतमाळ | **विद्याशाखा**- कला,वाणिज्य आणि विज्ञान |
| | **स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड** | |
| ३१ | जयक्रांती शिक्षण प्रसारक मंडळाचे स्वामी विवेकानंद महाविद्यालय, एम.आय.डी.सी. कळंब रोड, लातूर | कला, वाणिज्य, विज्ञान-कालावधी-०३ वर्षे<br>(बी.ए., बी.कॉम (इंग्रजी मा.), बी.एस्सी) |
| | **सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे** | |
| ३२ | सूर्यदत्ता एज्युकेशन फाऊंडेशनचे सूर्यदत्ता इंटरनॅशनल इन्स्टिट्युट ऑफ सायबर सिक्युरिटी, पत्ता-बावधन, ता.मुळशी, जि.पुणे, पिन-४११०२१ | सायबर सेक्युरीटी |
| ३३ | साई सकल शिक्षण प्रसारक मंडळ औरंगाबादचे, ज्ञानेश्वर वरिष्ठ कला,वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय डुडळगाव ता. पिंपरी चिंचवड (महानगरपालिका हद्द जि. पुणे.) | कला, वाणिज्य व विज्ञान |
| ३४ | श्री.गणेश शिक्षण प्रसारक मंडळाचे, माननीय तात्यासाहेब तथा विश्वासराव देवरे कला,वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, उमराणे, ता.देवळा, जि.नाशिक, पिन-४२३ ११०. | कला, वाणिज्य व विज्ञान |
| | **गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली** | |
| ३५ | चंद्रभागा स्मृती विकास बहुउद्देशिय संस्था .पवनी जि , भंडारा | कलावाणिज्य व विज्ञान , |

## २. अटी व शर्ती :-

१. सदर महाविद्यालयाची मान्यता ही कायम विनाअनुदान तत्वावर राहील.
२. नवीन महाविद्यालय/संस्थेने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत, असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.
३. महाविद्यालयाने/संस्थेने हमीपत्र सादर केल्याशिवाय आणि तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.
४. महाविद्यालयाने, संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक

असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. ३ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ॲफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

७. मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयाने सक्षम प्राधिकरणाने विहीत केलेल्या कालमर्यादेत नॅक मुल्यांकन करुन घेण्यासाठी प्रयत्न करावा व याबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील.

८. लिगल एज्युकेशन अधिनियम, २००८ व तद्नुषंगिक नियमांतील तरतूदीनुसार मान्यताप्राप्त नवीन महाविद्यालयाने बार कौन्सिल ऑफ इंडियाची (B.C.I.) प्रकरणपरत्वे मान्यता/ संलग्निकरण घेण्याची कार्यवाही विहीत कालावधीत करावी.

९. ज्या शैक्षणिक वर्षासाठी महाविद्यालय सुरु करण्यास परवानगी देण्यात आलेली आहे, त्या शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे आवश्यक आहे. संलग्निकरण किंवा इतर शिखर संस्था/केंद्रीय नियामक मंडळे यांची परवानगी मिळण्यास विलंब झाल्यामुळे जर महाविद्यालय त्या शैक्षणिक वर्षात सुरु होऊ शकले नाही तर, त्या शैक्षणिक वर्षाच्या पुढील शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे अनिवार्य राहील. अन्यथा दिलेली परवानगी आपोआप रद्द समजण्यात येईल.

३. संबंधित विद्यापीठाने संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी शासन मान्यता आदेशांचे अवलोकन केल्याशिवाय व संबंधित विभागीय सहसंचालकाचे अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

४. संबंधित विद्यापीठाने व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर महाविद्यालयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०% किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर महाविद्यालयांची मान्यता रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००७३११२०४२८०७०८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatray Vasantrao Kharke

Digitally signed by Dattatray Vasantrao Kharke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=higher & technical education dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, cn=Dattatray Vasantrao Kharke
Date: 2020.08.01 00:42:53 +05'30'

**(द. व. खारके)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे.
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
६) संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत)
७) निवडनस्ती (मशि-४)